**अशासकिय संस्था, औद्योगिक संस्था आणि वनविभाग यांच्यामार्फत त्रिपक्षीय करारनामा करुन अवनत वनक्षेत्राचे पुनर्वनीकरण करण्याबाबत.**
**औद्योगिक संस्था- बहुजन हिताय सामाजिक बांधिलकी संस्था, पुणे.**
**अशासकिय संस्था- वैदेही दत्ताजी गायकवाड चॅरीटेबल टस्ट, पुणे आणि उपवनसंरक्षक शहापूर.**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन आदेश क्रमांकः एफएलडी-२०२३/प्र.क्र.१५६/फ-१०**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २५/०८/२०२३

**प्रस्तावना-**

अवनत वनक्षेत्राचे पुनर्वनीकरण करण्यासाठी खाजगी व अशासकीय संस्थांचा सहभाग घेण्याबाबत त्रिपक्षीय करारनामा करुन वनीकरण हाती घेण्याच्या धोरणास शासनाने शासन निर्णय क्र.एफएलडी-२०११/प्र.क्र.१६७/फ-१०, दिनांक २३/०९/२०११ अन्वये मान्यता दिली आहे. तदनंतर सुधारीत शासन निर्णय क्रमांक एफएलडी-२०११/प्र.क्र.१६७/फ-१०, दिनांक ०५/०६/२०२३ अन्वये निर्गमित करण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयामध्ये गठीत उच्चाधिकार समितीपुढे बहुजन हिताय सामाजिक बांधिलकी संस्था, पुणे या औद्योगिक संस्थेचा मौजे. आगळंबे, ता. हवेली, जि. पुणे येथील ३३.०० हेक्टर अवनत वनक्षेत्रावर वनीकरण करण्याचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व केंद्रस्थ अधिकारी तथा सदस्य सचिव, उच्चाधिकार समिती यांनी पत्र क्र.कक्ष-१७/नोसेल/१७-४/प्र.क्र.१६५/४४५/२३-२४,नागपूर, दिनांक १५/०५/२०२३ अन्वये सादर केला होता. सदर प्रस्तावास उच्चाधिकार समितीने चक्राकार पध्दतीने दिनांक ३१/०७/२०२३ रोजी दिलेल्या मान्यतेस अनुलक्षून शासन पुढीलप्रमाणे आदेश निर्गमित करीत आहे.

**शासन आदेश-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व केंद्रस्थ अधिकारी तथा सदस्य सचिव, उच्चाधिकार समिती यांनी सादर केलेल्या प्रस्तावाचा साकल्याने विचार करुन, शासन आता असे आदेश देत आहे की, बहुजन हिताय सामाजिक बांधिलकी संस्था, पुणे या औद्योगिक संस्थेच्या प्रस्तावास अनुसरुन अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी दिनांक १५/०५/२०२३ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार खाली नमूद केलेल्या ठिकाणी बहुजन हिताय सामाजिक बांधिलकी संस्था, पुणे ही औद्योगिक संस्था, वैदेही दत्ताजी गायकवाड चॅरीटेबल टस्ट, पुणे ही अशासकिय संस्था व उपवनसंरक्षक पुणे यांच्यामध्ये त्रिपक्षीय करार करुन एकूण ३३.०० हेक्टर अवनत वनक्षेत्रावर वृक्ष लागवड करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| गाव | गट क्रमांक | वैधानिक दर्जा | लागवडयोग्य क्षेत्र (हेक्टर) | लागवडीसाठी प्रस्तावित रोपे |
|---|---|---|---|---|
| मौजे-आगळंबे, ता.हवेली, जि.पुणे. | १४९९, १५००, १५०५ व १५०७ | राखीव वन | ३३.०० | ११११ रोपे प्रती हेक्टर प्रमाणे एकुण ३६,६६३ रोपे. |
| **एकूण वनक्षेत्र (हेक्टर)** | | | **३३.००** | |

२. सदर प्रकल्पास दिलेली मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

i. वरील अवनत वनक्षेत्रात वृक्ष लागवड करणे, जल व मृदसंधारण करणे, ७ वर्षापर्यंत त्यांचे संरक्षण व संवर्धन करण्याचे काम बहुजन हिताय सामाजिक बांधिलकी संस्था, पुणे यांच्या अर्थसहाय्याने वैदेही दत्ताजी गायकवाड चॅरीटेबल टस्ट, पुणे यांनी करावे.

ii. प्रकल्पासाठी व त्याच्या व्यवस्थापनासाठी येणारा खर्च बहुजन हिताय सामाजिक बांधिलकी संस्था, पुणे ही औद्योगिक संस्था करेल.

iii. प्रकल्पांतर्गत करण्यात येणारी वृक्ष लागवड ही वन विभागाच्या अधिकाऱ्यांच्या पर्यवेक्षणाखाली करण्यात यावी. करारनाम्यानंतर २ वर्षांच्या आत वृक्ष लागवड पूर्ण करण्यात यावी.

iv. प्रकल्पासाठी शासनपत्र क्र.एफएलडी-१०१२/प्र.क्र.२०३/फ-१०, दिनांक ०८/०१/२०१३ अन्वये विहित केलेल्या त्रिपक्षीय करारनाम्याच्या मसुद्याप्रमाणे बहुजन हिताय सामाजिक बांधिलकी संस्था, पुणे यांच्या अर्थसहाय्याने वैदेही दत्ताजी गायकवाड चॅरीटेबल टस्ट, आणि उपवनसंरक्षक पुणे यांच्यामध्ये त्रिपक्षीय करारनामा करण्यात यावा. वन विभागाच्या वतीने त्रिपक्षीय करारनाम्यावर स्वाक्षरी करण्यासाठी उपवनसंरक्षक पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

v. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे किंवा त्यांनी प्राधिकृत केलेले वन विभागाचे कोणतेही अधिकारी यांना प्रकल्प स्थळी भेट देवून प्रकल्पाचे निरीक्षण करण्याचा व त्याबाबत सुधारणा / सूचना करण्याचा अधिकार राहील.

vi. त्रिपक्षीय करारनाम्यातील कोणत्याही अटीचा औद्योगिक संस्था बहुजन हिताय सामाजिक बांधिलकी संस्था, पुणे किंवा अशासकिय संस्था वैदेही दत्ताजी गायकवाड चॅरीटेबल टस्ट, यांच्याकडून भंग झाल्यास त्रिपक्षीय करारनामा तात्काळ समाप्त करण्याचा अथवा इतर कोणतीही दंडात्मक कार्यवाही करण्याचा अधिकार प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना असेल.

vii. ज्या ठिकाणी आवश्यकता असेल त्या ठिकाणी औद्योगिक संस्थेच्या खर्चाव्दारे रोपवनास तारेचे कुंपण (Wire Fencing) करण्यात यावे.

viii. आवश्यकतेनुसार रोपवनास सिंचनाची व्यवस्था करण्यात यावी. सदर सिंचनाची व्यवस्था करताना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० चा भंग होणार नाही याची दक्षता संबंधित संस्था आणि उपवनसंरक्षक यांनी घ्यावी.

ix. बहुजन हिताय सामाजिक बांधिलकी संस्था, पुणे ही औद्योगिक संस्था व वैदेही दत्ताजी गायकवाड चॅरीटेबल टस्ट, पुणे ही अशासकिय संस्था यांना शासन निर्णय क्रमांक एफएलडी-२०११/ प्र.क्र.१६७/फ-१०, दिनांक ०५/०६/२०२३ मधील सर्व अटी व शर्ती बंधनकारक राहतील.

x. त्रिपक्षीय कराराअंतर्गत रोपवन कामे करताना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० व इतर वन कायद्यांचा भंग होणार नाही याची दक्षता संबंधित संस्था आणि उपवनसंरक्षक यांनी घ्यावी.

xi. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) पुणे यांनी सादर केलेले रोपवन अनुभव प्रमाणपत्र ग्राह्य धरुन सदर त्रिपक्षीय करारनाम्यास मान्यता देण्यात येत आहे.

xii. जर प्रस्तावीत रोपवनाचे काम चालु वर्षाच्या कार्य आयोजने अंतर्गत कुपात करण्यात येणार नसेल तर रोपवनाचे काम सुरु करण्यापूर्वी नवीन विचलन प्रस्ताव मंजूर करुन घेण्यात यावा. त्यानंतरच काम सुरु करण्यात यावे.

xiii. त्रिपक्षीय कराराअंतर्गत प्रस्तावीत रोपवनाच्या ठिकाणी कोणत्याही प्रकारचे बांधकाम किंवा वनतळे तयार करता येणार नाही.

३. वरील ठिकाणी वृक्ष लागवड करताना, ती केल्यानंतरच्या ७ वर्षाच्या कालावधीत आणि भविष्यात कधीही या वनक्षेत्रावर बहुजन हिताय सामाजिक बांधिलकी संस्था, पुणे, ही औद्योगिक संस्था, वैदेही दत्ताजी गायकवाड चॅरीटेबल टस्ट, पुणे ही अशासकीय संस्था यांना कोणताही कायदेशीर व मालकी हक्क प्राप्त होणार नाही आणि त्याबद्दल त्यांना कोणत्याही न्यायालयात वा प्राधिकरणापुढे कोणताही दावा दाखल करता येणार नाही.

4. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना आवश्यक वाटतील अशा इतर अटी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०८२९१६४५५८९७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANESH TUKARAM JADHAO

Digitally signed by GANESH TUKARAM JADHAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0078f58512d3ac01315bbbfa4b473ed7729dd2d31644106e2966ab9ee6e92d7d, pseudonym=9511E397949CD516110AD2C5719C064356E8E6EF, serialNumber=6FEEDE606678D569A76B842319BD1C2969AA85BBA5CDCCEE147249F17965E8BB, cn=GANESH TUKARAM JADHAO
Date: 2023.08.29 16:50:35 +05'30'

**( गणेश जाधव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), पुणे.
४) उपवनसंरक्षक, पुणे.
५) बहुजन हिताय सामाजिक बांधिलकी संस्था, पुणे,
६) वैदेही दत्ताजी गायकवाड चॅरीटेबल टस्ट, पुणे .
7) निवडनस्ती (फ-१० कार्यासन).